**<u>आदिवासी सेवक पुरस्कार प्राप्त व्यक्ती, अर्जुन, राजीव गांधी खेलरत्न पुरस्कार, ध्यानचंद पुरस्कार, शिवछत्रपती पुरस्कारार्थी ( फक्त खेळाडू), हिंद केसरी, रुस्तम-ए-हिंद भारत केसरी व महान भारत केसरी हे किताब प्राप्त खेळाडूंचा प्राधान्यक्रम यादीमध्ये समावेश करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्र. आरक्षण २०१५/प्र.क्र.२६/मिव्य-२**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक :- २८.०५.२०१५**

**<u>वाचा:</u>** १) शासन निर्णय क्र. आरक्षण- २००२/ प्र.क्र. १२६/मिव्य-२, दि. ३१.०७.२००३

२) शासन निर्णय क्र. आरक्षण- २०१०/ प्र.क्र. ४५/मिव्य-२, दि. २४.०५.२०१०

३) शासन निर्णय क्र. आरक्षण- २०१०/ प्र.क्र. १०३/मिव्य-२, दि. १५.०१.२०११

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय दि. ३१.०७.२००३ मधील **अनुक्रमांक ३** ) खालील शासकीय विश्रामगृहातील कक्षांचे आरक्षण अग्रक्रमासंदर्भात अतिमहत्त्वाच्या व्यक्तींसाठी प्राधान्यक्रम विचारात घेवून दि. १५.०१.२०११ रोजी काढलेल्या शासन निर्णयातील **अनुक्रमांक १६)** मधील डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलित मित्र, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे (राज्य शासन पुरस्कार प्राप्त) व अपंग गुणवंत कामगार ( राज्य/ केंद्र शासन पुरस्कार प्राप्त ) यांच्यानंतर आदिवासी सेवक पुरस्कार प्राप्त व्यक्ती व त्यानंतर अर्जुन, राजीव गांधी खेलरत्न पुरस्कार, ध्यानचंद पुरस्कार, शिवछत्रपती पुरस्कारार्थी ( फक्त खेळाडू ), हिंद केसरी, रुस्तम-ए-हिंद भारत केसरी व महान भारत केसरी हे किताब प्राप्त खेळाडू यांचा समावेश करण्यात येत असून प्राधान्यक्रमाची सुधारीत यादी खालीलप्रमाणे आहे :-

१) महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल

२) राज्याचे मुख्यमंत्री

३) विधानपरिषदेचे सभापती/ विधानसभेचे अध्यक्ष/ उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमुर्ती

४) लोक आयुक्त

५) मा. मंत्री/ मा. विरोधी पक्षनेते विधान परिषद व विधान सभा

६) उच्च न्यायालयाचे न्यायमुर्ती

७) विधानपरिषदेचे उपसभापती/ विधानसभेचे उपाध्यक्ष

८) मा. राज्यमंत्री

९) विधान मंडळाच्या समित्यांचे सभासद

१०) लोकप्रतिनिधी ( खासदार/ आमदार )

११) राज्य शासनाचे शासकीय कामानिमित्त दौ-यावर असणारे अधिकारी/ कर्मचारी

१२) केंद्र शासनाचे शासकीय कामानिमित्त दौ-यावर असणारे अधिकारी/ कर्मचारी

१३) राज्य शासनाचे कामावर नसतांना येणारे अधिकारी/ कर्मचारी

१४) इतर राज्य शासनाचे शासकीय कामानिमित्त दौ-यावर असणारे अधिकारी/ कर्मचारी

१५) माजी खासदार/ आमदार/ स्वातंत्र संग्राम सेनानी/ राज्य शासनाचे सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी

१६) अधिस्वीकृत पत्रकार/ डॉ. बाबासाहेब आंबेडकर दलित मित्र, लोकशाहिर अण्णाभाऊ साठे ( राज्य शासन पुरस्कार प्राप्त ) व अपंग गुणवंत कामगार ( राज्य / केंद्र शासन पुरस्कार प्राप्त )/ **आदिवासी सेवक पुरस्कार प्राप्त व्यक्ती/ अर्जुन, राजीव गांधी खेलरत्न पुरस्कार, ध्यानचंद पुरस्कार, शिवछत्रपती पुरस्कारार्थी (फक्त खेळाडू), हिंद केसरी, रुस्तम-ए-हिंद भारत केसरी व महान भारत केसरी किताब प्राप्त खेळाडू**

१७) खाजगी व्यक्ती

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०९१२१४४५८७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sheela Dattatraya Waghchaure

Digitally signed by Sheela Dattatraya Waghchaure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sheela Dattatraya Waghchaure
Date: 2015.06.09 12:17:42 +05'30'

**( शी.द.वाघचौरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. महाराष्ट्राचे राज्यपालांचे, सचिव, राजभवन, मुंबई,

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य , मंत्रालय, मुंबई,

४) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव, सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
८) प्रबंधक उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
९) प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई,
१०) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) सामान्य प्रशासन (राजशिष्टाचार शाखा) विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५) मा.राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१६) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१७) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
१८) सर्व अधीक्षक अभियंते,सार्वजनिक बांधकाम मंडळ
१९) सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग/ सर्व जिल्हा परिषदा
२०) महालेखापाल महाराष्ट्र १/ महाराष्ट्र २, मुंबई / नागपूर,
२१) मा.सचिव (बां.) /(रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई,
२२) कार्यासन (मि.व्य.-२), (निवड नस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई,
२३) माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.